गिरणा प्रकल्पाच्या सा क्र २०५०० वरील
बांधकामास  देण्यात आलेली प्रशासकीय
मान्यता रद्द करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१३/(१३६ /२०१३)/सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: १४.०८.२०१४

**वाचा :-**

शासन निर्णय क्रमांक दुरुस्ती  २००९/(३०७/२००९) सिंव्य (कामे) दि.३.८.२००९

**प्रस्तावना**

गिरणा प्रकल्पाचा जामदा डावा कालवा सा.क्र.२०५०० वरील जलसेतूचे बांधकाम सन १८५२ मध्ये झाले आहे.  सन १९६०साली सदर बांधकामाची वहन क्षमता वाढविण्यासाठी मजबूतीकरण करण्यांत आले. दिनांक २७/१२/२००७ रोजी जलसेतुच्या खांबांचा खालील बाजूचा पाया अचानक झुकल्याने दगडी बांधकामाच्या कमानींना तडे जावून ट्रफ पर्यंत पोहचल्याने पाण्याची गळती सुरु झाली. सदर बांधकाम जुने व निकामी झाल्याने आताच्या जलसेतुच्या शेजारीच २० मी.अंतरावर उपलब्ध जागेत नवीन जलसेतुचे बांधकाम प्रस्तावित केले होते त्यास शासन निर्णय क्रमांक दुरुस्ती-२००९(३०७/२००९) सिंव्य(कामे) दिनांक ३/८/२००९ अन्वये रु.१६४.५६ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि  सदर कामास अदयाप प्रारंभ न झाल्यामुळे व अदयाप या प्रकल्पावर काहीही खर्च न केल्यामुळे सन २०११-१२ च्या दरसूचीवर अंदाजपत्रक अदयावत करुन प्रशासकीय मान्यता मिळणेंसाठी प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. याबाबत सर्व  बाबीचा विचार करुन दिनांक ३.८.२००९ अन्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

## शासन निर्णय

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता शासनाने आता दिनांक ३.८.२००९ अन्वये दिलेली प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात येत आहे. त्यामुळे या प्रशासकीय मान्यतेतंर्गत यापुढे कुठलाही खर्च करण्यात येऊ नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१६१८००३७६३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.16 17:58:10 +05'30'

(कि.ल.संखे)

शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,

८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,

९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,

१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१२.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव

१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव

१५.सह सचिव, वित्त विभाग(व्यय १२) वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई

१६.सह सचिव, नियोजन विभाग(कार्यासन १४३४) नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई

१७.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१८.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१९.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२०.अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगाव

२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२२.कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग , जळगांव

२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,

२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.